**बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम, २०१५ अंतर्गत बालकांची काळजी घेण्याऱ्या संस्थांच्या नोंदणी प्रमाणपत्राबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन पुरकपत्र क्रमांकः बालगृ-२०२०/प्र.क्र.२३/का-०८**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक- २६ एप्रिल, २०२२.

वाचा :-

१. शासन निर्णय समक्रमांक दि.१६.११.२०२१
२. शासन शुध्दीपत्रक समक्रमांक दि.२४.११.२०२१
३. अवर सचिव, महिला व बाल विकास मंत्रालय, भारत सरकार यांचे दि.०२.०२.२०२२ रोजीचे पत्र

प्रस्तावना :-

मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल जनहित याचिका क्र.५७/२०१६ मध्ये मा. न्यायालयाने दिलेल्या निर्देशानुसार तसेच मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे अध्यक्षतेखाली दि.०१.०२.२०१९ व ०८.०२.२०१९ रोजी झालेल्या राज्य कृती दलाच्या बैठकीमध्ये घेण्यात आलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम, २०१५ मधील कलम ४३(१) आणि महाराष्ट्र राज्य (मुलांची काळजी व संरक्षण) नियम, २०१८ मधील नियम २३ मधील तरतूदींनुसार राज्यातील महानगरपालिका क्षेत्रामध्ये रस्त्यांवरील बालकांच्या पुर्नवसनासाठी खुली निवारागृहे (Open Shelter) स्थापन करण्यासाठी वाचा येथील वाचा क्र.१ अन्वये २६ स्वयंसेवी संस्थांच्या खुले निवारागृह प्रस्तावांना विनाअनुदानीत तत्वावर शासन निर्णयाच्या दिनांकापासून पुढील पाच वर्षासाठी मान्यता देण्यात आलेली आहे.

२. उपरोक्त २६ प्रस्ताव दि.२३.१२.२०२१ रोजीच्या केंद्र शासनाच्या प्रकल्प मंजूरी समितीच्या बैठकीत केंद्र शासनाच्या मंजूरीसाठी ठेवण्यात आले होते. सदर २६ पैकी ६ स्वयंसेवी संस्थांच्या प्रस्तावांना केंद्र शासनाने एकात्मिक बाल संरक्षण योजनेंतर्गत अनुदानीत तत्वावर मान्यता दिली असून त्या संस्था केंद्र शासनाचे अनुदान प्राप्त होण्यासाठी पात्र झाल्या असल्याने या स्वयंसेवी संस्थांना विनाअनुदानीत ऐवजी अनुदानीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन पुरकत्रक-:**

बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम, २०१५ मधील कलम ४३(१) आणि महाराष्ट्र राज्य (मुलांची काळजी व संरक्षण) नियम, २०१८ मधील नियम २३ मधील तरतूदींनुसार राज्यातील मुंबई, पुणे व उल्हासनगर या तीन महानगरपालिका क्षेत्रामध्ये रस्त्यांवरील बालकांच्या पुर्नवसनासाठी अनुक्रमे ३, २ व १ याप्रमाणे एकूण ६ खुले निवारागृह संस्थांना केंद्र शासनाकडून वाचा क्र.३ अन्वये एकात्मिक बाल संरक्षण योजनेंतर्गत अनुदानीत तत्वावर मान्यता मिळालेली आहे. भविष्यामध्ये जर केंद्र शासनाकडून मान्यता मिळालेल्या ६ संस्थांना अनुदान उपलब्ध करुन देण्यात आले नाही तर राज्य शासनाकडून त्यांना वेगळ्याने अनुदान प्राप्त होणार नाही या अटीच्या अधीन राहून पुढील संस्थांच्या नोंदणी प्रमाणपत्रामध्ये विनाअनुदानीत ऐवजी अनुदानीत असा बदल करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | महानगरपालिका | संस्थेचे नाव व पत्ता | खुले निवारागृहाचे नाव व पत्ता | मुले/ मुली | प्रवेशित क्षमता | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | बृहन्मुंबई | अपने आप व्यूमन्स कलेक्टीव, पहिली गल्ली, खेतवाडी, म्युनिसिपल स्कूल पहिला मजला, अलंकार सिनेमा जवळ, मुंबई ०६ | अपने आप व्यूमन्स कलेक्टीव, पहिली गल्ली, खेतवाडी, म्युनिसिपल स्कूल पहिला मजला, अलंकार सिनेमा जवळ, मुंबई ०६ | मुले | २५ | अनुदानीत |
| २ | बृहन्मुंबई | अपने आप व्यूमन्स कलेक्टीव, पहिली गल्ली, खेतवाडी, म्युनिसिपल स्कूल पहिला मजला, अलंकार सिनेमा जवळ, मुंबई ०६ | अपने आप व्यूमन्स कलेक्टीव, अकरावी गल्ली, ६१ बी रुम नं ६, तळा मजला शंकराव पुपालामार्ग मार्ग पोच्चम्मा देवी मंदिरासमोरा जोहरा स्वीट शेजारी मुंबई ०६ | मुले | २५ | अनुदानीत |
| ३ | बृहन्मुंबई | सालव्हेशन आर्मी, जीवनाशा, ड्रापिंगसेंटर मुनशी चाळ, दुसरा मजला कामाठी पुरा, अकरावी गल्ली, भायखळा, मुंबई ०८ | सालव्हेशन आर्मी, जीवनाशा, ड्रापिंगसेंटर नाईट शेल्टर मुनशी चाळ, दुसरा मजला कामाठी पुरा, अकरावी गल्ली, भायखळा, मुंबई ०८ | मुले | २५ | अनुदानीत |

| अ. क्र. | महानगरपालिका | संस्थेचे नाव व पत्ता | खुले निवारागृहाचे नाव व पत्ता | मुले/ मुली | प्रवेशित क्षमता | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|
| ४ | उल्हासनगर | श्रमिक महिला मंडळ हरि अर्पाटमेंट, रुम नं. ४०१, उल्हासनगर-०४ | श्रमिक महिला मंडळहरि अर्पाटमेंट, रुम नं. ४०१, उल्हासनगर-०४ | मुले | २५ | अनुदानीत |
| ५ | पुणे | नीती निकेतन बहुउदेशिय शिक्षण संस्था संचलित मातोश्री रेवम्मा मुलींचे खुले निवारागृह | गुरुकृपा गंगानगर स्मशानभुमी रोड, फुरसंगी, जिल्हा पुणे ४१२३०८ | मुली | २५ | अनुदानीत |
| ६ | पुणे | श्री साईसेवाभावी संस्था लातुर | सिध्दीविनायक कॉलनी गंगा नगर गल्ली नं ७ पुणे महानगरपालिका क्षेत्र, फुरसुंगी, पुणे. | मुले | २५ | अनुदानीत |

२. उपरोक्त ६ संस्थांच्या नोंदणी प्रमाणपत्रामध्ये विनाअनुदानीत ऐवजी अनुदानीत असा बदल करुन सुधारीत नोंदणी प्रमाणपत्र निर्गमीत करण्याची जबाबदारी आयुक्त, महिला व बाल विकास यांची राहील.

३. सदर शासन पूरकपत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०४२६१२४८०१२३३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Nilesh Janardan Patil

Digitally signed by Nilesh Janardan Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b7f57a5d2af23fdb37cfec3c30cfe085ddbef06ea381e7e81401a472bbb966f7, cn=Nilesh Janardan Patil
Date: 2022.04.26 15:17:27 +05'30'

(डॉ. निलेश ज. पाटील)

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष/ सदस्य, विधानसभा/ विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. मा.मंत्री/ राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांची खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

७. प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
९. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
१०.महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर
११.सर्व उपसचिव, सर्व अवर सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.उपायुक्त (बाल विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे
१३.कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-६/ अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई
१४.सर्व कार्यासने, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१५.सर्व संबंधित स्वयंसेवी संस्था (आयुक्तालयामार्फत)
१६.निवड नस्ती, का-०८.